2011060910261300l




RNI No. MAHBIL/2009/35530

# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक ५] सोमवार, एप्रिल १८, २०११/चैत्र २८, शके १९३३ [पृष्ठे १०, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक २६

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक १८ एप्रिल २०११ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

ह. बा. पटेल,
सचिव,
महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

## सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ११.

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर "**महाराष्ट्र शासन राजपत्रात**" दिनांक १८ एप्रिल २०११ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी अधिनियम.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नव्हते ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली होती ; आणि, म्हणून त्यांनी दिनांक १० मार्च २०११ रोजी महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०११ प्रख्यापित केला होता ;

१८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०.

**आणि ज्याअर्थी,** उक्त अध्यादेशाचे राज्य विधानमंडळाच्या अधिनियमात रुपांतर करणे इष्ट आहे ; त्याअर्थी, भारतीय गणराज्याच्या बासष्टाव्या वर्षी याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

२०११ चा महा. अध्या. १०.

प्रकरण एक

**प्रारंभिक**

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

**१.** (१) या अधिनियमास, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अधिनियम, २०११ असे म्हणावे.

(२) तो, दिनांक १० मार्च २०११ रोजी अंमलात आला असल्याचे मानण्यात येईल.

प्रकरण दोन

**मुंबई महानगरपालिका अधिनियमाची सुधारणा.**

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १२८ ची सुधारणा.

**२.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या (यात यापुढे या प्रकरणात ज्याचा निर्देश "मुंबई महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे), याच्या कलम १२८ मधील पोट-कलम (३) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :— १८८८ चा मुंबई ३.

"(३) पोट-कलमे (१) व (२) यामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, महानगरपालिकेस, सरकारी वर्ष २०१०-२०११ व २०११-२०१२ या दरम्यान, कोणत्याही वेळी, इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता, प्रत्येक उक्त दोन वर्षांसाठी स्वतंत्रपणे मालमत्ता करांचे दर निर्धारित करता येतील. मालमत्ता कराचे असे निर्धारित केलेले दर त्या दोन वर्षांच्या १ एप्रिल पासून अंमलात येतील आणि तेव्हापासून ते अंमलात आले असल्याचे मानण्यात येईल आणि उक्त दोन वर्षांसाठीचे कर, अशा निर्धारित केलेल्या दराने बसविण्यायोग्य व देय असतील.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४०अ ची सुधारणा.

**३.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४०अ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मधील,—

(क) पहिल्या परंतुकानंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु आणखी असे की, ज्या कोणत्याही निवासी किंवा अनिवासी इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या बाबतीतील मालमत्ता कर हा, संमती-नि-परवानगी आकार (लिव्ह अॅन्ड लायसन्स आकार) मग तो कोणत्याही नावाने संबोधला गेला असेल, विचारात घेऊन आलेल्या वार्षिक भाडे मूल्याच्या आधारे बसविला असेल अशा इमारती व तिच्या भागाच्या संबंधात, पहिल्या परंतुकाच्या प्रयोजनार्थ, अशा लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविण्यायोग्य असलेला असा मालमत्ता कर हा, अशी इमारत किंवा तिच्या भागाचा स्वतः भोगवटा करीत असल्याप्रमाणे आणि तशी निर्धारण पुस्तकात नोंद घेतली असल्याप्रमाणे, निश्चित करणे आयुक्तास विधिसंमत असेल : " ;

(ख) दुसऱ्या परंतुकातील, " आणखी असे की " या मजकुराऐवजी, " तसेच " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

" (२) कलम १३९अ च्या पोट-कलम (४) मध्ये किंवा या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये किंवा महानगरपालिकेने भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी संमत केलेला ठराव, कोणताही असल्यास, त्यामध्ये, काहीही अंतर्भूत असले तरी, मात्र कलम १५४अ च्या तरतुदींना अधीन राहून,
२०१० चा महा. २७. महाराष्ट्र महानगरपालिका व नगरपरिषदा (तिसरी सुधारणा) अधिनियम, २०१० याचे कलम ३ अंमलात येण्याच्या दिनांकास म्हणजेच दिनांक २६ ऑगस्ट २०१० रोजी भांडवली मूल्य निश्चित करण्याची प्रक्रिया चालू असलेल्या इमारती व जमिनी यांच्या संबंधात, ते अशा रीतीने निश्चित होईपर्यंत, अशा इमारती व जमिनी यांच्या संबंधात बसविण्यायोग्य व देय असलेला मालमत्ता कर हा, मागील वर्षामध्ये, म्हणजेच १ एप्रिल २००९ रोजी सुरू होणाऱ्या वर्षाकरिता आणि ३१ मार्च २०१० रोजी संपणाऱ्या वर्षाकरिता बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका तात्पुरता असेल ; आणि वर्ष २०१०-२०११ व २०११-२०१२ या प्रत्येक वर्षासाठी असा तात्पुरता कर हा, अशा प्रत्येक वर्षासाठी स्वतंत्रपणे बजावण्यात येईल अशा तात्पुरत्या बिलानुसार बसविण्यायोग्य व देय असेल. तथापि, असे असले तरी, संबंधित इमारतीच्या व जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित झाल्यावर, मालमत्ता कराच्या निर्धारणाच्या भांडवली मूल्यावर आधारित एक अंतिम बिल त्यानंतर उपरोक्तप्रमाणे अशा प्रत्येक वर्षासाठी बजावण्यात येईल. अशा अंतिम निर्धारणानंतर, निर्धारितीने अधिक रक्कम भरली आहे असे आढळून आले तर, कलम १७९ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, अशी अधिक रक्कम, अंतिम बिल बजावल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत, आणि कलम २१७ चे पोट-कलम (५) च्या पहिल्या परंतुकान्वये तरतूद केल्याप्रमाणे अशा दिनांकापासून व्याजासह, परत करण्यात येईल किंवा निर्धारितीची संमती मिळवून, पुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देय रकमेचे, कोणतीही असल्यास, प्रदान म्हणून ती रक्कम समायोजित करण्यात येईल; आणि अंतिम निर्धारणानंतर कराची रक्कम ही निर्धारितीने यापूर्वीच भरलेल्या कराच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, त्यातील फरकाची रक्कम निर्धारितीकडून वसूल करण्यात येईल.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५४अ ऐवजी बदली कलम दाखल करणे.

४. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५४अ ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल,—

विवक्षित प्रकरणांत भांडवली मूल्याची तात्पुरती निश्चिती.

" १५४अ. कलम १५४ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, २००९-२०१० या सरकारी वर्षाकरिता, कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे किंवा तिच्या भागाचे पट्टीयोग्य मूल्य हे, सरकारी वर्ष २०१०-२०११ आणि २०११-२०१२ यासाठी अशा इमारतींचे किंवा जमिनींचे २०१०-२०११ आणि २०११-२०१२ या सरकारी वर्षांच्या बाबतीत तात्पुरते भांडवली मूल्य असेल आणि असे तात्पुरते भांडवली मूल्य हे, त्यांचे अंतिम भांडवली मूल्य निश्चित होईपर्यंत ते या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये वैधरीतीने व कायदेशीरपणे निश्चित केलेले भांडवली मूल्य असल्याचे मानण्यात येईल ; आणि या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये ठेवलेल्या निर्धारण पुस्तकाच्या प्रयोजनार्थ, आयुक्ताने, पट्टीयोग्य मूल्य हे तात्पुरते भांडवली मूल्य आहे असे समजणे विधिसंमत असेल ; आणि कलम १४०अ च्या पोट-कलम (२) अन्वये, बजावण्यात आलेले मालमत्ता कराचे बिल हे या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये वैधरीतीने व कायदेशीरपणे बजावण्यात आले असल्याचे मानण्यात येईल.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १७२ ऐवजी बदली कलम दाखल करणे.

५. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १७२ ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

पाणी कर व पाणी आकार आणि मल:निस्सारण कर व मल:निस्सारण आकार याचे नियम आणि त्याची सुधारणा.

" १७२. (१) महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अधिनियम, २०११ द्वारे सुधारणा केलेल्या कलम १४०अ आणि कलम १५४अ च्या तरतुदी २०१०-२०११ आणि २०११-२०१२ या वर्षांकरिता पाणी कर व पाणी आकार आणि मल:निस्सारण कर व मल:निस्सारण आकार बसविण्याच्या प्रयोजनांसाठी योग्य त्या फेरफारांसह, लागू करण्यात येतील. २०११ चा महा. ११.

(२) स्थायी समितीस, कलमे १६९ व १७० अन्वये (दोन्हींसह) करण्यात आलेल्या किंवा करण्यात आले असल्याचे मानण्यात आलेल्या कोणत्याही नियमांमध्ये, वेळोवेळी, भर घालता येईल, सुधारणा करता येईल किंवा ते विखंडित करता येतील. परंतु, या नियमांची कोणतीही सुधारणा ही, पोट-कलम (१) च्या तरतुदींना अधीन राहून या प्रयोजनांसाठी समितीने नियुक्त केलेल्या दिनांकास अंमलात येईल, तथापि, असा दिनांक हा, अशी सुधारणा करण्याचा निर्णय स्थायी समितीने ज्या सरकारी वर्षात घेतला असेल त्या सरकारी वर्षाच्या १ एप्रिल पूर्वीचा असणार नाही :

परंतु, २०१०-२०११ आणि २०११-२०१२ या सरकारी वर्षांकरिता निश्चित केलेले नियम हे, प्रत्येक संबंधित सरकारी वर्षाच्या पहिल्या दिवशी अंमलात येतील.".

६. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २१६अ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम २१६ब समाविष्ट करणे.

" २१६ब. या अधिनियमात किंवा त्याखाली करण्यात आलेल्या नियमात एतद्‌विरूद्ध काहीही अंतर्भूत असले तरी, या प्रकरणाअन्वये बसविण्यायोग्य असलेले कोणतेही कर किंवा फी यांचा भरणा करण्यास पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीचे कोणत्याही कारणास्तव, जर कोणत्याही वर्षातील करनिर्धारण केले गेले नसेल तर, आयुक्तास, ज्या दिनांकास ती व्यक्ती, आकारणी करण्यास पात्र झाली असेल त्या दिनांकापासून सहा वर्षांच्या आत, कोणत्याही वेळी, अशा व्यक्तीवर कराची आणि देय फीची आकारणी करणारी नोटीस बजावता येईल ; आणि अशी नोटीस बजावल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत तीद्वारे त्यावरील प्रदानाची मागणी करता येईल आणि या अधिनियमाच्या आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमांच्या तरतुदी, शक्य असेल तेथवर, ज्या वर्षात कराचा किंवा फीचा संबंध येतो त्या वर्षात अशी आकारणी करण्यात आली होती असे समजून, लागू करण्यात येतील.". करनिर्धारण झाले नसेल अशा प्रकरणांमध्ये आकारणी करण्याचा अधिकार.

७. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २१९अ मध्ये, " २०१० " या मजकुरानंतर, पुढील मजकूर समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१९अ ची सुधारणा.

२०११ चा महा. ११. " किंवा यथास्थिति, महाराष्ट्र महानगरपालिका व नगरपरिषदा (सुधारणा) अधिनियम, २०११,".

प्रकरण तीन

## मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याची सुधारणा.

१९४९ चा मुंबई ५९. ८. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे, या प्रकरणात ज्याचा निर्देश " प्रांतिक महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम १२९ मधील, पोट-कलम (२) मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १२९ ची सुधारणा.

(क) पहिल्या परंतुकानंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु आणखी असे की, ज्या कोणत्याही निवासी किंवा अनिवासी इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या बाबतीतील मालमत्ता कर हा, संमती-नि-परवानगी आकार (लिव्ह अॅन्ड लायसन्स आकार) मग तो कोणत्याही नावाने संबोधला गेला असेल, विचारात घेऊन आलेल्या वार्षिक भाडे मूल्याच्या आधारे बसविला असेल अशा इमारती व तिच्या भागाच्या संबंधात, पहिल्या परंतुकाच्या प्रयोजनार्थ, अशा लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविण्यायोग्य असलेला असा मालमत्ता कर हा, अशी इमारत किंवा तिच्या भागाचा स्वतः भोगवटा करीत असल्याप्रमाणे आणि तशी निर्धारण पुस्तकात नोंद घेतली असल्याप्रमाणे, निश्चित करणे आयुक्तास विधिसंमत असेल :" ;

(ख) दुसऱ्या परंतुकातील " आणखी असे की " या मजकुराऐवजी, " तसेच " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १२९-२क समाविष्ट करणे.

**९.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२९-१क नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

भांडवली मूल्याधरील मालमत्ता कराच्या बाबतीत संक्रमणकालीन तरतुदी.

"**१२९-२क.** (१) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जेथे इमारतींच्या व जमिनीच्या भांडवली मूल्याच्या आधारे, शहरातील इमारती व जमिनी यांवर मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी महानगरपालिकेने ठराव संमत केला असेल तेथे, ज्या सरकारी वर्षात इमारतींच्या व जमिनीच्या भांडवली मूल्याच्या आधारे, असा कर बसविला असेल त्या वर्षात पुढील तरतुदी लागू होतील :—

(एक) शहरातील इमारती व जमिनी यांचे भांडवली मूल्य निश्चित करण्यात येईपर्यंत, अशा इमारती व जमिनी यांच्या संबंधात बसविण्यायोग्य आणि देय असलेला मालमत्ता कर हा, तात्पुरत्या स्वरूपात, मागील वर्षामध्ये, बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका असेल ; आणि तदनुसार महानगरपालिकेस, त्या कराकरिता तात्पुरते बिल बजावणे विधिसंमत असेल ;

(दोन) इमारतीचे व जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित केल्यानंतर, महानगरपालिका, मालमत्ता करांच्या आकारणीचे अंतिम बिल बजावील ;

(तीन) अशा अंतिम निर्धारणानंतर, निर्धारितीने अधिक रक्कम भरली आहे असे आढळून आले तर, अशी अधिक रक्कम, अंतिम बिल बजावल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत, अंतिम बिलाच्या दिनांकापासून व्याजासह, परत करण्यात येईल किंवा निर्धारितीची संमती मिळवून, पुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देय रकमेचे, कोणतीही असल्यास, प्रदान म्हणून ती रक्कम समायोजित करण्यात येईल ; आणि अंतिम निर्धारणानंतर कराची रक्कम ही निर्धारितीने यापूर्वीच भरलेल्या कराच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, त्यांतील फरकाची रक्कम निर्धारितीकडून वसूल करण्यात येईल.

(२) महानगरपालिका, ज्या सरकारी वर्षामध्ये, भांडवली मूल्याच्या आधारे इमारती व जमिनीवर मालमत्ता कर बसविण्याचे ठरवील ते सरकारी वर्ष समाप्त झाल्यावर, या कलमाच्या तरतुदी, अंमलात असण्याचे बंद होईल.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १५०क समाविष्ट करणे.

**१०.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५० नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

"१५०क. या अधिनियमात किंवा त्याखाली करण्यात आलेल्या नियमात एतद्‌विरूद्ध काहीही अंतर्भूत असले तरी, या अधिनियमान्वये बसविण्यायोग्य असलेले कोणतेही कर किंवा फी यांचा भरणा करण्यास पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीचे कोणत्याही कारणास्तव, जर कोणत्याही वर्षातील करनिर्धारण केले गेले नसेल तर, आयुक्तास, ज्या दिनांकास ती व्यक्ती, आकारणी करण्यास पात्र झाली असेल त्या दिनांकापासून सहा वर्षाच्या आत, कोणत्याही वेळी, अशा व्यक्तीवर कराची आणि देय फीची आकारणी करणारी नोटीस बजावता येईल ; आणि अशी नोटीस बजावल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत तीद्वारे त्यावरील प्रदानाची मागणी करता येईल आणि या अधिनियमाच्या आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमांच्या तरतुदी, शक्य असेल तेथवर, ज्या वर्षात कराचा किंवा फीचा संबंध येतो त्या वर्षात अशी आकारणी करण्यात आली होती असे समजून, लागू करण्यात येतील.".

करनिर्धारण झाले नसेल अशा प्रकरणांमध्ये आकारणी करण्याचा अधिकार.

प्रकरण चार

## नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याची सुधारणा.

१९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २.

११. नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे, या प्रकरणात ज्याचा निर्देश "नागपूर महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे), याच्या कलम ११५क मधील, पोट-कलम (२) मध्ये,—

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११५क ची सुधारणा.

(क) पहिल्या परंतुकानंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

"परंतु आणखी असे की, ज्या कोणत्याही निवासी किंवा अनिवासी इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या बाबतीतील मालमत्ता कर हा, संमती-नि-परवानगी आकार (लिव्ह अ‍ॅन्ड लायसन्स आकार) मग तो कोणत्याही नावाने संबोधला गेला असेल, विचारात घेऊन आलेल्या वार्षिक भाडे मूल्याच्या आधारे बसविला असेल अशा इमारती व तिच्या भागाच्या संबंधात, पहिल्या परंतुकाच्या प्रयोजनार्थ, अशा लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविण्यायोग्य असलेला असा मालमत्ता कर हा, अशी इमारत किंवा तिच्या भागाचा स्वत: भोगवटा करीत असल्याप्रमाणे आणि तशी निर्धारण पुस्तकात नोंद घेतली असल्याप्रमाणे, निश्चित करणे आयुक्तास विधिसंमत असेल : " ;

(ख) दुसऱ्या परंतुकातील "आणखी असे की" या मजकुराऐवजी, "तसेच" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

१२. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११५कक नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ११५ककक समाविष्ट करणे.

"११५ककक. (१) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जेथे इमारतींच्या व जमिनीच्या भांडवली मूल्याच्या आधारे, शहरातील इमारती व जमिनी यांवर मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी महानगरपालिकेने ठराव संमत केला असेल तेथे, ज्या सरकारी वर्षात इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्याच्या आधारे, असा कर बसविला असेल त्या वर्षात पुढील तरतुदी लागू होतील :—

भांडवली मूल्यावरील मालमत्ता कराच्या बाबतीत संक्रमणकालीन तरतुदी.

(एक) शहरातील इमारती व जमिनी यांचे भांडवली मूल्य निश्चित करण्यात येईपर्यंत, अशा इमारती व जमिनी यांच्या संबंधात बसविण्यायोग्य व देय असलेला मालमत्ता कर हा, तात्पुरत्या स्वरूपात, मागील वर्षामध्ये बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका असेल ; आणि तद्नुसार महानगरपालिकेस, त्या कराकरिता तात्पुरते बील बजावणे विधिसंमत असेल ;

(दोन) इमारतीचे व जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित केल्यानंतर महानगरपालिका, मालमत्ता कराच्या आकारणीचे अंतिम बील बजावील ;

(तीन) अशा अंतिम निर्धारणानंतर, निर्धारितीने अधिक रक्कम भरली आहे असे आढळून आले तर, अशी अधिक रक्कम, अंतिम बील बजावल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत, अंतिम बिलाच्या दिनांकापासून व्याजासह परत करण्यात येईल किंवा निर्धारितीची संमती मिळवून, पुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देय रकमेचे, कोणतीही असल्यास, प्रदान म्हणून ती रक्कम समायोजित करण्यात येईल ; आणि अंतिम निर्धारणानंतर कराची रक्कम ही निर्धारितीने यापूर्वीच भरलेल्या कराच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, त्यातील फरकाची रक्कम निर्धारितीकडून वसूल करण्यात येईल.

(२) महानगरपालिका, ज्या सरकारी वर्षामध्ये, भांडवली मूल्याच्या आधारे इमारती व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याचे ठरवील ते सरकारी वर्ष समाप्त झाल्यावर, या कलमाच्या तरतुदी, अंमलात असण्याचे बंद होईल.".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम १५५ख समाविष्ट करणे.

**१३.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५५क नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

करनिर्धारण झाले नसेल अशा प्रकरणांमध्ये आकारणी करण्याचा अधिकार.

"**१५५ख.** या अधिनियमात किंवा त्याखाली करण्यात आलेल्या नियमात एतद्‌विरूद्ध काहीही अंतर्भूत असले तरी, या अधिनियमान्वये बसविण्यायोग्य असलेले कोणतेही कर किंवा फी यांचा भरणा करण्यास पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीचे कोणत्याही कारणास्तव, जर कोणत्याही वर्षातील करनिर्धारण केले गेले नसेल तर, आयुक्तास, ज्या दिनांकास ती व्यक्ती, आकारणी करण्यास पात्र झाली असेल त्या दिनांकापासून सहा वर्षांच्या आत, कोणत्याही वेळी, अशा व्यक्तीवर कराची आणि देय फीची आकारणी करणारी नोटीस बजावता येईल ; आणि अशी नोटीस बजावल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत तीद्वारे त्यावरील प्रदानाची मागणी करता येईल आणि या अधिनियमाच्या आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमांच्या तरतुदी, शक्य असेल तेथवर, ज्या वर्षात कराचा किंवा फीचा संबंध येतो त्या वर्षात अशी आकारणी करण्यात आली होती असे समजून, लागू करण्यात येतील.".

प्रकरण पाच

## महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ याची सुधारणा

१९६५ चा महा. ४०. **१४.** महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती आणि औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (यात यापुढे, या प्रकरणात ज्याचा निर्देश "नगरपरिषदा अधिनियम" असा करण्यात आला आहे), याच्या कलम १०५ मधील, पोट-कलम (४) मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १०५ ची सुधारणा.

(क) पहिल्या परंतुकानंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु आणखी असे की, ज्या कोणत्याही निवासी किंवा अनिवासी इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या बाबतीतील मालमत्ता कर हा, संमती-नि-परवानगी आकार (लिव्ह ॲन्ड लायसन्स आकार) मग तो कोणत्याही नावाने संबोधला गेला असेल, विचारात घेऊन आलेल्या वार्षिक भाडे मूल्याच्या आधारे बसविला असेल अशा इमारती व तिच्या भागाच्या संबंधात, पहिल्या परंतुकाच्या प्रयोजनार्थ, अशा लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविण्यायोग्य असलेला असा मालमत्ता कर हा, अशी इमारत किंवा तिच्या भागाचा स्वत: भोगवटा करीत असल्याप्रमाणे आणि तशी निर्धारण पुस्तकात नोंद घेतली असल्याप्रमाणे, निश्चित करणे मुख्य अधिकाऱ्यास विधिसंमत असेल : " ;

(ख) दुसऱ्या परंतुकातील " आणखी असे की " या मजकुराऐवजी, " तसेच " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

**१५.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १०६क नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम १०६ख समाविष्ट करणे.

**" १०६ख.** (१) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जेथे इमारतींच्या व जमिनीच्या भांडवली मूल्याच्या आधारे, नगरपालिका क्षेत्रातील इमारती व जमिनी यांवर मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी नगरपरिषदेने ठराव संमत केला असेल तेथे, ज्या सरकारी वर्षात इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्याच्या आधारे, असा कर बसविला असेल त्या वर्षात पुढील तरतुदी लागू होतील :— भांडवली मूल्यावरील मालमत्ता कराच्या बाबतीत संक्रमणकालीन तरतुदी.

(एक) नगरपालिका क्षेत्रातील इमारती व जमिनी यांचे भांडवली मूल्य निश्चित करण्यात येईपर्यंत, अशा इमारती व जमिनी यांच्या संबंधात बसविण्यायोग्य व देय असलेला मालमत्ता कर हा, तात्पुरत्या स्वरूपात, मागील वर्षामध्ये, बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका असेल ; आणि तद्नुसार नगरपरिषदेस, त्या कराकरिता तात्पुरते बिल बजावणे विधिसंमत असेल ;

(दोन) इमारतीचे व जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित केल्यानंतर नगरपरिषद, मालमत्ता कराच्या आकारणीचे अंतिम बील बजावील ;

(तीन) अशा अंतिम निर्धारणानंतर, निर्धारितीने अधिक रक्कम भरली आहे असे आढळून आले तर, अशी अधिक रक्कम, अंतिम बील बजावल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत, अंतिम बिलाच्या दिनांकापासून व्याजासह परत करण्यात येईल किंवा निर्धारितीची संमती मिळवून, पुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देय रकमेचे, कोणतीही असल्यास, प्रदान म्हणून ती रक्कम समायोजित करण्यात येईल ; आणि अंतिम निर्धारणानंतर कराची रक्कम ही निर्धारितीने यापूर्वीच भरलेल्या कराच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, त्यांतील फरकाची रक्कम निर्धारितीकडून वसूल करण्यात येईल.

(२) नगरपरिषद, ज्या सरकारी वर्षामध्ये, भांडवली मूल्याच्या आधारे इमारती व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याचे ठरवील ते सरकारी वर्ष समाप्त झाल्यावर, या कलमाच्या तरतुदी, अंमलात असण्याचे बंद होईल.".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम १५०ग समाविष्ट करणे.

**१६.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५०ख नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

करनिर्धारण झाले नसेल अशा प्रकरणांमध्ये आकारणी करण्याचा अधिकार.

"**१५०ग.** या अधिनियमात किंवा त्याखाली करण्यात आलेल्या नियमात एतद्विरुद्ध काहीही अंतर्भूत असले तरी, या प्रकरणाअन्वये बसविण्यायोग्य असलेले कोणतेही कर किंवा फी यांचा भरणा करण्यास पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीचे कोणत्याही कारणास्तव, जर कोणत्याही वर्षातील करनिर्धारण केले गेले नसेल तर, आयुक्तांस, ज्या दिनांकास ती व्यक्ती, आकारणी करण्यास पात्र झाली असेल त्या दिनांकापासून सहा वर्षांच्या आत, कोणत्याही वेळी, अशा व्यक्तीवर कराची आणि देय फीची आकारणी करणारी नोटीस बजावता येईल ; आणि अशी नोटीस बजावल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत तीद्वारे त्यावरील प्रदानाची मागणी करता येईल आणि या अधिनियमाच्या आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमांच्या तरतुदी, शक्य असेल तेथवर, ज्या वर्षात कराचा किंवा फीचा संबंध येतो त्या वर्षात अशी आकारणी करण्यात आली होती असे समजून, लागू करण्यात येतील.".

## प्रकरण सहा

## संकीर्ण

सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १० याचे निरसन व व्यावृत्ती.

**१७.** (१) महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०११ हा, याद्वारे निरसित करण्यात येत आहे. २०११ चा महा. अध्या. १०.

(२) असे निरसन झाले असले तरी, उक्त अध्यादेशाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांच्या संबंधित तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही गोष्ट किंवा कार्यवाही (काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा आदेश यांसह) ही, या अधिनियमाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या संबद्ध अधिनियमाच्या संबंधित तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही गोष्ट, कार्यवाही किंवा यथास्थिति, काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा दिलेला आदेश असल्याचे मानण्यात येईल.

१८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNIROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

RNI No. MAHENG/2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक १०] सोमवार, एप्रिल १८, २०११/चैत्र २८, शके १९३३ [पृष्ठे ९, किंमत : रुपये १४.००

असाधारण क्रमांक ४३

प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Act, 2011 (Mah. Act No. XI of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,

Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

### MAHARASHTRA ACT No. XI OF 2011.

*(First published, after having received the assent of the Governor in the "Maharashtra Government Gazette", on the 18th April 2011.)*

An Act further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965.

WHEREAS both Houses of the State Legislature were not in session ;

AND WHEREAS the Governor of Maharashtra was satisfied that circumstances existed which rendered it necessary for him to take immediate action further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes hereinafter appearing; and, therefore, promulgated the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2011, on the 10th March 2011; Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P and Berar II of 1950. Mah. XL of 1965. Mah. Ord. X of 2011.

AND WHEREAS it is expedient to replace the said Ordinance by an Act of the State Legislature; it is hereby enacted in the Sixty-second Year of the Republic of India as follows :—

## CHAPTER I

### PRELIMINARY

Short title and commencement.

1. (*1*) This Act may be called the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Act, 2011.

(*2*) It shall be deemed to have come into force on the 10th March 2011.

## CHAPTER II

### AMENDMENTS TO THE MUMBAI MUNICIPAL CORPORATION ACT

Amendment of section 128 of Bom. III of 1888.

2. In section 128 of the Mumbai Municipal Corporation Act, (hereinafter, in this Chapter, referred to as "the Mumbai Corporation Act"), for sub-section (*3*), the following sub-section shall be substituted, namely :— Bom. III of 1888.

"(*3*) Notwithstanding anything contained in sub-sections (*1*) and (*2*), the Corporation may, at any time during the official years 2010-2011 and 2011-2012, determine, separately for each of the said two years, the rates of property taxes for different categories of users of a building or land or part thereof. The rates of property taxes so determined shall be effective and shall be deemed to have been effective from the 1st of April of those two years and the taxes for the said two years shall be leviable and payable at the rates so determined.".

Amendment of section 140A of Bom. III of 1888.

3. In section 140A of the Mumbai Corporation Act,—

(*1*) in sub-section (*1*), —

(*a*) after the first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

" Provided further that, where the property taxes levied in respect of any residential or non-residential building or portion thereof were on the basis of annual letting value arrived at considering leave and licence charges, by whatever name called, then for the purposes of the first proviso it shall be lawful for the Commissioner to ascertain such tax leviable during such

immediately preceding year, as if such building or portion thereof were self-occupied and had been so entered in the assessment book ;";

(*b*) in the second proviso, for the word " further" the word "also" shall be substituted ;

(*2*) for sub-section (2), the following sub-section shall be substituted, namely :—

"(*2*) Notwithstanding anything contained in sub-section (*4*) of section 139A or any other provisions of this Act or Resolution, if any, passed by the Corporation for adopting the levy of property tax on the basis of capital value but subject to the provisions of section 154A, buildings and lands in respect of which the process of fixing capital value is in progress on the 26th August 2010, being the date of coming into force of section 3 of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Third Amendment) Act, 2010, until it is so fixed; the tax leviable and payable in respect of such buildings and lands shall provisionally be equal to the amount of tax leviable and payable in the preceding year, that is to say, for the year commencing on the first day of April 2009 and ending on the thirty-first day of March 2010 and such provisional tax shall be leviable and payable for each of the years 2010-2011 and 2011-2012 according to the provisional bills which may be issued separately for each such year; so, however, that on fixation of capital value of the respective buildings and lands, final bill of assessment of property taxes on the basis of capital value may then be issued for each such year as aforesaid. After such final assessment, if it is found that the assessee has paid excess amount, such excess shall, notwithstanding anything contained in section 179, be refunded within three months from the date of issuing the final bill, alongwith interest from such date as provided in the first proviso to sub-section (*5*) of section 217, or after obtaining the consent of the assessee, shall be adjusted towards payment of property tax due, if any, for the subsequent years; and if the amount of taxes on final assessment is more than the amount of tax already paid by the assessee, the difference shall be recovered from the assessee." .

Mah. XXVII of 2010.

**Substitution of section 154A of Bom. III of 1888.**

**4.** For section 154A of the Mumbai Corporation Act, the following section shall be substituted, namely :—

**Provisional fixation of capital value in certain cases.**

"**154A.** Notwithstanding anything contained in section 154, the rateable value of any building or land or part thereof, for the official year 2009-2010, shall be the provisional capital value of such buildings or lands in respect of the official years 2010-2011 and 2011-2012, and such provisional capital value shall be deemed to be the capital value validly and legally fixed under the provisions of this Act, pending fixing

the capital value thereof; and it shall be lawful for the Commissioner to treat it as such for the purposes of assessment book kept under the provisions of this Act, and the bill for property taxes issued under sub-section (2) of section 140A shall be deemed to have been validly and legally issued under the provisions of this Act.".

Substitution of section 172 of Bom.III of 1888.

**5.** For section 172 of the Mumbai Corporation Act, the following section shall be substituted, namely :—

Rules for water taxes and charges and sewerage taxes and charges and amendment thereof.

"**172.** (*1*) The provisions of sections 140A and 154A, as amended by the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Act, 2011, shall, *mutatis mutandis* apply, for the purposes of levy of water taxes and charges and sewerage taxes and charges for the years 2010-2011 and 2011-2012. Mah. XI of 2011.

(*2*) The Standing Committee may, from time to time, add to, amend or rescind any rules made or deemed to be made by it under sections 169 and 170 (both inclusive), but any such revision of the rules shall, subject to the provisions of sub-section (*1*), come into force on the date appointed by the Committee for this purpose so however that such date shall not be earlier than the 1st April of the official year during which the decision to make such revision is taken by the Standing Committee :

Provided that, the rules fixing the rates for the official years 2010-2011 and 2011-2012 shall be effective from the first day of each respective official year.".

Insertion of section 216B in Bom. III of 1888.

**6.** After section 216A of the Mumbai Corporation Act, the following section shall be inserted, namely :-

Power to assess in case of escape from assessment.

"**216B.** Notwithstanding anything to the contrary contained in this Act or the rules made thereunder, if for any reason any person liable to pay any of the taxes or fees leviable under this Chapter has escaped assessment in any year, the Commissioner may, at any time within six years from the date on which such person should have been assessed, serve on such person a notice assessing him to the tax or fee due and demanding payment thereon within 15 days from the date of such service; and the provisions of this Act and the rules made thereunder shall, so far as may be, apply as if assessment was made in the year to which the tax or fee relates.".

Amendment of section 219A of Bom. III of 1888.

**7.** In section 219A of the Mumbai Corporation Act, after the figures "2010", the following shall be inserted, namely :—

"or, as the case may be, by the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Act, 2011,". Mah XI of 2011.

## CHAPTER III

### AMENDMENTS TO THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949.

Bom. LIX of 1949.

Amendment of section 129 of Bom. LIX of 1949.

**8.** In section 129 of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (hereinafter, in this Chapter, referred to as " the Provincial Corporations Act "), in sub-section (*2*), —

(*a*) after the first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

" Provided further that, where the property taxes levied in respect of any residential or non-residential building or portion thereof were on the basis of annual letting value arrived at considering leave and licence charges, by whatever name called, then for the purposes of the first proviso, it shall be lawful for the Commissioner to ascertain such tax leviable during such immediately preceding year, as if such building or portion thereof were self-occupied and had been so entered in the assessment book :";

(*b*) in the second proviso, for the word " further " the word " also " shall be substituted.

Insertion of section 129-2A in Bom. LIX of 1949.

**9.** After section 129-1A of the Provincial Corporations Act, the following section shall be inserted, namely :—

Transitory provisions in respect of property taxes on capital value.

" **129-2A.** (*1*) Where a Corporation passes a resolution to adopt levy of property taxes on buildings and lands in the City, on the basis of capital value of buildings and lands, notwithstanding anything contained in any other provisions of this Act, the following provisions shall apply in the official year in which such tax is levied on the basis of capital value of buildings and lands, namely :—

(*i*) until the capital value of the buildings and lands in the City are fixed, the tax leviable and payable in respect of such buildings and lands shall provisionally be equal to the amount of tax leviable and payable in the preceding year and it shall be lawful for the Corporation to issue a provisional bill for the tax accordingly ;

(*ii*) on fixation of the capital value of the buildings and lands, the Corporation shall issue a final bill of assessment of property taxes ;

(*iii*) after such final assessment, if it is found that the assessee has paid excess amount, such excess shall be refunded within three months from the date of issuing the final bill, alongwith interest from the date of final bill, or after obtaining the consent of the assessee, shall be adjusted towards payment of property taxes due, if any, for the subsequent years; and if the amount of tax on final assessment is more than the amount of tax already paid by the assessee, the difference shall be recovered from the assessee.

(2) The provisions of this section shall cease to operate after expiry of the official year in which the Corporation has decided to levy property tax on the basis of capital value of buildings and lands.".

Insertion of section 150A in Bom. LIX of 1949.

10. After section 150 of the Provincial Corporations Act, the following section shall be inserted, namely :—

Power to assess in case of escape from assessment.

"150A. Notwithstanding anything to the contrary contained in this Act or the rules made thereunder, if for any reason any person liable to pay any of the taxes or fees leviable under this Act has escaped assessment in any year, the Commissioner may, at any time within six years from the date on which such person should have been assessed, serve on such person a notice assessing him to the tax or fee due and demanding payment thereon within 15 days from the date of such service; and the provisions of this Act and the rules made thereunder shall, so far as may be, apply as if assessment was made in the year to which the tax or fee relates.".

## CHAPTER IV

### AMENDMENTS TO THE CITY OF NAGPUR CORPORATION ACT, 1948.

Amendment of section 115A of C.P. and Berar II of 1950.

11. In section 115A of the City of Nagpur Corporation Act, 1948 (hereinafter, in this Chapter, referred to as " the Nagpur Corporation Act "), in sub-section (2),— C.P. and Berar II of 1950.

(a) after the first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

" Provided further that, where the property taxes levied in respect of any residential or non-residential building or portion thereof were on the basis of annual value arrived at considering leave and licence charges, by whatever name called, then for the purposes of the first proviso, the property taxes leviable during such immediately preceding year shall be ascertained on the basis of the tax which could be leviable and payable as if the building or portion thereof were self-occupied and had been so entered in the assessment book :";

(b) in the second proviso, for the word " further " the word " also " shall be substituted.

Insertion of section 115AAA in C.P. and Berar II of 1950.

12. After section 115AA of the Nagpur Corporation Act, the following section shall be inserted, namely :—

Transitory provisions in respect of property tax on capital value.

"115AAA. (1) Where the Corporation passes a resolution to adopt levy of property taxes on buildings and lands in the City, on the basis of capital value of buildings and lands, notwithstanding anything contained in any other provisions of this Act, the following provisions shall apply in the official year in which such tax on the basis of capital value of buildings and lands is levied, namely :—

(*i*) until the capital value of the buildings and lands in the City are fixed, the tax leviable and payable in respect of such buildings and lands shall provisionally be equal to the amount of tax leviable and payable in the preceding year and it shall be lawful for the Corporation to issue a provisional bill for the tax accordingly ;

(*ii*) on fixation of the capital value of the buildings and lands, the Corporation shall issue a final bill of assessment of property taxes ;

(*iii*) after such final assessment, if it is found that the assessee has paid excess amount, such excess shall be refunded within three months from the date of issuing the final bill, alongwith interest from the date of final bill, or after obtaining the consent of the assessee, shall be adjusted towards payment of property taxes, due, if any, for the subsequent years; and if the amount of tax on final assessment is more than the amount of tax already paid by the assessee, the difference shall be recovered from the assessee.

(*2*) The provisions of this section shall cease to operate after expiry of the official year in which the Corporation has decided to levy property tax on the basis of capital value of buildings and lands.".

**13**. After section 155A of the Nagpur Corporation Act, the following section shall be inserted, namely :— Insertion of section 155B in C.P. and Berar II of 1950.

"**155B**. Notwithstanding anything to the contrary contained in this Act or the rules made thereunder, if for any reason any person liable to pay any of the taxes or fees leviable under this Act has escaped assessment in any year, the Commissioner may, at any time within six years from the date on which such person should have been assessed, serve on such person a notice assessing him to the tax or fee due and demanding payment thereon within 15 days from the date of such service; and the provisions of this Act and the rules made thereunder shall, so far as may be, apply as if assessment was made in the year to which the tax or fee relates.". Power to assess in case of escape from assessment.

## CHAPTER V

### AMENDMENTS TO THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, *NAGAR PANCHAYATS* AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

Mah. XL of 1965. **14**. In section 105 of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (hereinafter, in this Chapter, referred to as " the Municipal Councils Act"), in sub-section (*4*),— Amendment of section 105 of Mah. XL of 1965.

(*a*) after the first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

" Provided further that, where the property taxes levied in respect of any residential or non-residential building or portion thereof

were on the basis of annual letting value arrived at considering leave and licence charges, by whatever name called, then for the purposes of the first proviso, it shall be lawful for the Chief Officer to ascertain such tax leviable during such immediately preceding year, as if such building or portion thereof were self-occupied and had been so entered in the assessment book:";

(*b*) in the second proviso, for the word " further" the word "also" shall be substituted.

Insertion of section 106B in Mah. XL of 1965.

**15.** After section 106A of the Municipal Councils Act, the following section shall be inserted, namely :—

Transitory provisions in respect of property tax on capital value.

" **106B.** (*1*) Where a Council passes a resolution to adopt levy of property taxes on buildings and lands in the municipal area, on the basis of capital value of buildings and lands, notwithstanding anything contained in any other provisions of this Act, the following provisions shall apply in the official year in which such tax on the basis of capital value of buildings and lands is levied, namely :—

(*i*) until the capital value of the buildings and lands in the municipal area are fixed, the tax leviable and payable in respect of such buildings and lands shall provisionally be equal to the amount of tax leviable and payable in the preceding year and it shall be lawful for the Council to issue a provisional bill for tax accordingly ;

(*ii*) on fixation of the capital value of the buildings and lands, the Council shall issue a final bill of assessment of property taxes;

(*iii*) after such final assessment, if it is found that the assessee has paid excess amount, such excess shall be refunded within three months from the date of issuing the final bill, alongwith interest from the date of final bill, or after obtaining the consent of the assessee, shall be adjusted towards payment of property taxes due, if any, for the subsequent years; and if the amount of tax on final assessment is more than the amount of tax already paid by the assessee, the difference shall be recovered from the assessee.

(*2*) The provisions of this section shall cease to operate after expiry of the official year in which the Council has decided to levy property tax on the basis of capital value of buildings and lands.".

16. After section 150B of the Municipal Councils Act, the following section shall be inserted, namely :— Insertion of section 150C in Mah. XL of 1965.

"150C. Notwithstanding anything to the contrary contained in this Act or the rules made thereunder, if for any reason any person liable to pay any of the taxes or fees leviable under this Chapter has escaped assessment in any year, the Chief Officer may, at any time within six years from the date on which such person should have been assessed, serve on such person a notice assessing him to the tax or fee due and demanding payment thereon within 15 days from the date of such service; and the provisions of this Act and the rules made thereunder shall, so far as may be, apply as if assessment was made in the year to which the tax or fee relates.". Power to assess in case of escape from assessment.

## CHAPTER VI

### MISCELLANEOUS

Mah. Ord. X of 2011. **17.** (*1*) The Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2011, is hereby repealed. Repeal of Mah. Ord. X of 2011 and saving.

Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965. (*2*) Notwithstanding such repeal, anything done or any action taken (including any notification or order issued) under the corresponding provisions of the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, as amended by the said Ordinance, shall be deemed to have been done, taken or issued, as the case may be, under the corresponding provisions of the relevant Act, as amended by this Act.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.